**सन २००९-१० मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे वितरण**
**विमान चालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक : बीयुडी -१००८/प्र.क्र.६९१/२८-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ११/२/२०१०

वाचा : १) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक : बीयुडी १००९/प्र.क्र.६८/ २००९/ पंचवीस ,दिनांक २४ मार्च, २००९.
२) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्रमांक : बीयुडी १००९/प्र.क्र.६८/ २००९/ पंचवीस , दिनांक ८ जुलै, २००९.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एव्हीएन-२००९/प्र क्र ५८६/२००९/ २८-अ, दिनांक ३ ऑगस्ट,२००९
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग समक्रमांक दिनांक १६ सप्टेंबर,२००९.
५) सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय यांचे पत्र क्रमांक : डीए/अेडीएम /१४४८/२००९, दिनांक २३ नोव्हेंबर,२००९.

**प्रस्तावना :-** संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २४ मार्च,२००९ आणि ८ जुलै,२००९ नुसार विमानचालन संचालनालय, मुंबई यांचेकरिता चालू आर्थिक वर्षी विविध उद्दिष्टांच्या खर्चासाठी एकूण रु.३६५.३३ लक्ष अंदाजपत्रकीय तरतूद मंजूर आहे. तसेच शासन निर्णय, दिनांक ३.८.२००९ अन्वये चालू आर्थिक वर्षी विमानचालन संचालनालयांतर्गत विविध बाबींच्या खर्चाकरिता पूरक मागणीद्वारे एकूण रु.९५२.०० लक्ष तरतूद मंजूर करण्यात आली आहे.
१.१ उपरोक्त रु.१३१७.३३ लक्ष अंदाजपत्रकीय तरतूदीपैकी
(अ) एप्रिल,२००९ ते जुलै,२००९ करिता लेखानुदानानुसार रु.१४६.१३ लक्ष निधी
(ब) शासन निर्णय, दिनांक १६ सप्टेंबर,२००९ अन्वये ऑगस्ट,२००९ ते नोव्हेंबर,२००९ करिता एकूण रु.१६२.४४ लक्ष आणि
(क) शासन निर्णय, दिनांक ३ ऑगस्ट,२००९ अन्वये रु.९५२.०० लक्ष मासिक निधी वितरण प्रणालीनुसार वितरण करण्यासाठी मान्यता देण्यात आली आहे. विमानचालन संचानलनालयाच्या संदर्भाधीन दिनांक २३ नोव्हेंबर,२००९ च्या पत्रानुसार मासिक निधी वितरण कार्यपध्दतीनुसार विमानचालन संचालनालयास चालू आर्थिक वर्षी अखेर रु.८,१३,६१,८३६/- निधी वितरीत करण्यात आला आहे.
१.२ विमानचालन संचालनालयाने संदर्भाधीन दिनांक २३ नोव्हेंबर,२००९ च्या पत्रान्वये चालू आर्थिक वर्षी विविध उद्दिष्टांवरील खर्चासाठी डिसेंबर,२००९ ते मार्च,२०१० करिता एकूण रु.५,०३,७१,१६४/- निधी मंजूर / वितरीत करणेबाबत प्रस्तावित केले आहे. त्यानुसार विमानचालन संचालनालयासाठी चालू आर्थिक वर्षी डिसेंबर,२००९ ते मार्च,२०१० करिता निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :

२. . विमानचालन संचालनालय, मुंबई अंतर्गत शासनमान्य बाबींच्या खर्चासाठी चालू आर्थिक वर्षी डिसेंबर, २००९ ते मार्च,२०१० या चार महिन्यांसाठी रु. ५०१.१६ लक्ष (रुपये पाच कोटी एक लक्ष सोळा हजार फक्त) तरतूद मासिक निधी वितरण प्रणालीव्दारे मंजूर करण्यात येत आहे. सदर निधीचा बाबनिहाय तपशील सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केला आहे. याप्रित्यर्थचा खर्च मासिक निधी वितरण प्रणालीनुसार करण्यांत यावा. तसेच, चालू आर्थिक वर्षीच्या मंजूर तरतूदीच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे मंजूर केलेल्या रु. ५०१.१६ लक्ष (रुपये पाच कोटी एक लक्ष सोळा हजार फक्त) तरतुदीचे संदर्भात सहाय्यक संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याप्रित्यर्थचा बाबनिहाय मासिक खर्चाचा प्रगती अहवाल महालेखापाल / अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई आणि सामान्य प्रशासन विभागाकडे प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत सादर करावा. अखर्चित अनुदान शासनाच्या मान्यतेशिवाय खर्च करु नये.

५. याप्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षीचा खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत मंजूर तरतुदीमधून भागविण्यांत यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा :-

मागणी क्रमांक ए-४, २०७०, इतर प्रशासनिक सेवा, ११४, परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण, (००)(०२) विमानचालन सल्लागार, महाराष्ट्र शासन (२०७० ०१५६)

६. हा शासन निर्णय संदर्भाधीन सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक दि. ८ जुलै, २००९ अन्वये प्रशासकीय विभागांस प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००२१५१२५१२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( अं. वि. अंभिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. संचालक/सहायक संचालक, विमान चालन संचालनालय, हँगर क्र. ६, जुहू विमानतळ, मुंबई
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. वित्त विभाग, का.-अर्थसंकल्प-१४/ व्यय-४, मंत्रालय,मुंबई,
७. उप सचिव (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई
८.कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.२५, मंत्रालय, मुंबई ३२,
९. निवड नस्ती.

**विमानचालन संचालनालय,मुंबई सन २००९-१० करिता माहे सन२००९-१० करिता माहे डिसेंबर, २००९ ते मार्च,२०१० साठी मासिक निधी वितरणाचा तपशील**

**( रुपये हजारात)**

| अ. क्र. | उद्दिष्ट | सन २००९ - १० साठी मंजूर तरतूद | बी.डी.एस. वर उपलब्ध केलेली तरतूद (नोव्हेंबर, २००९ अखेर) | शिल्लक तरतूद | डिसेंबर, २००९ | जानेवारी २०१० | फेब्रुवारी २०१० | मार्च, २०१० | एकूण डिसेंबर,२००९ ते मार्च,२०१० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | ०१ - वेतन | १,१३,३९ | ८६६९ | २६७० | ८,९० | ८,९० | ८,९० | - | २६,७० |
| २ | ०६ - दूरध्वनी, वीज व पाणी | ५,२५ | ३,१४ | २,११ | ५३ | ५३ | ५३ | ५२ | २११ |
| ३ | ११ - देशांतर्गत प्रवास | ११,५० | ६,४९ | ५०१ | १,२५ | १,२५ | १,२५ | १२६ | ५०१ |
| ४ | १३ - कार्यालयीन खर्च | १,५४,८० | ९४,२४ | ६०५६ | १५,१४ | १५,१४ | १५,१४ | १५,१४ | ६०५६ |
| ५ | १४ - भाडे पट्टी व कर | ३२,०० | २२,८७ | ९१३ | २२८ | २२८ | २२८ | २२९ | ९१३ |
| ६ | २० - इतर प्रशा. खर्च | २ | २ | -- | -- | -- | -- | -- | - |
| ७ | २७ - लहान बांधकामे | १४,१९४ | ९०,३८ | ५१५६ | १२,८९ | १२,८९ | १२,८९ | १२,८९ | ५१,५६ |
| ८ | ५० - इतर खर्च | २२,७०८ | ११,३९९ | ९३०९ | २३,२७ | २३,२७ | २३,२७ | २३,२७ | ९०,५४ |
| ९ | ५१ - मोटार वाहने | ७० | ७० | - | - | - | - | - | - |
| १० | ५२ - यंत्र सामग्री | ६३,०६५ | ३३,७०९ | २५,५५६ | ६३,८९ | ६३,८९ | ६३,८९ | ६३,८९ | २५,५५६ |
| | एकूण | १,३१,७३३ | ८१,३६१ | ५०,३७२ | १२,८१५ | १२,८१५ | १२,८१५ | ११,६७२ | ५०१,१७ |